**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
**माहिती तंत्रज्ञान संचालनालय**
**शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती ०४/२२४ /३९,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २६ मे, २००४

**वाचा :-** १) सा.प्र.वि,.शासन निर्णय,क्रमांक-प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७/८/२००१,
२) सा.प्र.वि,.शासन निर्णय, क्रमांक. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.५/२००१/३९, दि. २० जुलै,२००२,
३) सा.प्र.वि,.शासन निर्णय, क्रमांक. मातंस/प्र.क्र.३/६५/३९, दि. १८ जुलै,२००३,
४) सा.प्र.वि,.शासन निर्णय, क्रमांक. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.५/२००१/३९, दि. २/८/२००३,
५) सा.प्र.वि,.शासन निर्णय,क्रमांक. सेप्रनि-२००२/प्र.क्र.१४/०२/१२, दि. २/९/२००३.

**प्रस्तावना :-** उपरोक्त अनु क्रमांक ३ अन्वये शासकीय सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक अर्हता परीक्षेचे प्रमाणपत्र सादर करण्यासाठी दिनांक २०/७/२००४ पर्यन्त मुदत देण्यात आलेली आहे. तथापि शासनाच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची एकूण संख्या विचारात घेता राज्यातील सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक अर्हता परीक्षा प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठी अधिक अवधी देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच संगणक अर्हता परीक्षेबाबत प्राप्त झालेल्या सूचनांचा व अभिप्रायांचा विचार करुन सर्वंकष धोरण ठरविण्यासाठी प्रधान सचिव, साप्रवि (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात आली होती. या समितीने सादर केलेल्या अहवालानुसार संगणक अर्हता परीक्षेसंबंधी निर्णय घेण्याची बाब ही शासनाच्या विचाराधीन होती.

***शासन निर्णय :--***

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे संगणक अर्हता परीक्षा व तदनुषंगिक बाबींविषयी सर्वंकष धोरण ठरविण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**१)** यापूर्वी निर्गमित करण्यात आलेल्या दि. ७ ऑगस्ट,२००१ व दि. २० जुलै,२००२ शासन निर्णयांन्वये खालील नमुद (अ) व (ब ) यांना संगणक अर्हता परीक्षा म्हणून घोषित करण्यात आले होते, आता खाली नमुद केलेल्या (अ),(ब) व (क) या पर्यायांपैकी **कुठलीही एक परीक्षा** संगणक अर्हता परीक्षा म्हणून ग्राहय धरण्यात येईल

**(अ)** D.O.E.A.C.C. सोसायटीच्या (केन्द्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान विभागांर्तगत स्थापीत स्वायत्त संस्था) अधिकृत C.C.C. किंवा "O" स्तर किंवा "A" स्तर किंवा "B" स्तर किंवा "C" स्तर या पैकी कोणतीही एक परीक्षा,

**(ब)** महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडून घेण्यात येणारी MS-CIT परीक्षा,

**(क)** महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाकडून घेण्यात येणारी चाचणी परीक्षा (Confirmatory Test)

ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी पुर्वी पाच शासनमान्य संगणक संस्थांमधुन संगणक वापराबाबतचे विहित प्रमाणपत्र प्राप्त केले होते त्यांचेसाठी संगणक चाचणी परीक्षा (Confirmatary Test), उत्तीर्ण करणे आवश्यक होते. तथापि आता अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांनी उपरोक्त नमूद, (अ), (ब), (क),या तीन पर्यायी संगणक अर्हता परिक्षा म्हणून निश्चित करण्यात आल्यामुळे, या परीक्षांपैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक राहील. (यापूर्वीच्या अर्हतेसंबंधी काही कार्यवाही जसे प्रतिपुर्ती रकमेत कपात, वसुली इ. झाली असल्यास ती अबाधित राहील.)

तसेच सा.प्र.वि, शासन निर्णय क्रमांक. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.५/२००१/३९, दि. २/८/२००३, नुसार महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या खालील सहा पदवी/ पदविका / पदव्युत्तर पदविका उत्तीर्ण झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक अर्हता परीक्षा पुन्हा उत्तीर्ण करणे आवश्यक राहणार नाही.

| अ.क्र. | म.रा.तंत्रशिक्षण मंडळाच्या अभ्यासक्रमाचे नाव | स्तर |
|---|---|---|
| १ | संगणक तंत्रशास्त्र (Computer Technology) | पदविका |
| २ | संगणक अभियांत्रिकी (Computer Engg.) | पदविका |
| ३ | माहिती तंत्रज्ञान (Information Technology) | पदविका |
| ४ | संगणक उपयोजन (Computer Application) | पदविकोत्तर पदविका |
| ५ | संगणक उपयोजन पध्दती व पृथक्करण (ADCSSAA) | पदव्युत्तर/प्रगत पदविका |
| ६ | माहिती तंत्रज्ञान (Information Technology) | पदव्युत्तर पदविका |

**२)** सा.प्र.वि,शासन निर्णय,क्रमांक. सेप्रनि-२००२/प्र.क्र.१४/०२/१२, दि. २/९/२००३. अन्वये ५० वर्षावरील शासकीय सेवकांना संगणक अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करण्यापासून सूट देण्यात आली होती. परंतु असे स्पष्ट करण्यात येते की, ज्या अधिकारी / कर्मचा-यांनी पुर्वी पाच शासनमान्य संस्थांमधून प्रशिक्षण घेऊन संगणक परीक्षा उत्तीर्ण केली आहे आणि प्रशिक्षण शुल्क व प्रोत्साहनात्मक रक्कम यांची मागणी केली आहे किंवा घेतली आहे अशांना ५० वर्षे वयाची सूट लागू होणार नाही.

**३)** संगणक अर्हता परीक्षेमधून काही पदांना सूट देण्याबाबत बरीच निवेदने प्राप्त झाली होती. या नुसार संगणक अर्हता परीक्षेमधून, ज्या पदांना तुर्त संगणक प्रशिक्षण आवश्यक वाटत नाही अशा पदांना संबंधित विभागाच्या सचिवांनी संगणक अर्हता परिक्षेपासून सूट दयावी आणि अशा पदांची यादी या शासन निर्णयापासून तीन महिन्याच्या आत संबंधित विभागाच्या सचिवांनी जाहीर करावी. सदर सूट देण्याबाबतच्या यादीचा दर ३ वर्षांनी संबंधित विभागामार्फत फेर आढावा घेण्यात यावा. तसेच अंध किंवा संगणक हाताळण्यास शारीरीक दृष्ट्या सक्षम नसलेल्या व्यक्तींना संबंधित विभागाच्या सचिवांनी संगणक अर्हता परिक्षेमधुन सुट देण्याबाबत निर्णय घ्यावा.

**४)** संगणक हाताळणी/वापराबाबतची विहीत परीक्षा उत्तीर्ण करून विहित प्रमाणपत्र सादर करणा-या शासकीय सेवकास शासन निर्णय प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.५/२००१/३९ दि. २०.७.२००२ नुसार रु.३००/- (रु तिनशे फक्त) देय राहिल.

**५)** संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण करुन शासनास प्रमाणपत्र सादर करावयाच्या अवधीस दिनांक २०.७.२००४ पासून एक वर्षासाठी म्हणजे दि. २०.७.२००५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(सोनाली मुळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,